आमगाव पंचायत समिती (जिल्हा गोंदिया) गट विकास अधिकारी निवासस्थानाच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई २०१०/प्र.क्र.४/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- २७ जानेवारी,२०१०.

संदर्भ :-अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,गोंदिया, यांचे पत्र क्र.जिपगो/साबांवि/डे-२एफ/वशि३८६९/०९, दि.२२.१२.२००९

प्रस्तावना :-

अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, गोंदिया यांनी संदर्भीय दिनांक-२२.१२.२००९ च्या पत्रान्वये आमगाव पंचायत समितीच्या गट विकास अधिकारी निवासस्थानाच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे. अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद गोंदीया यांनी वरील पत्रात नमूद केले आहे की, आमगाव हा नलक्षग्रस्त व आदिवासी तालुका आहे. मात्र, या ठिकाणी आमगाव पंचायत समितीच्या गट विकास अधिकारी यांच्याकरीता निवासस्थान उपलब्ध नाही. शासनाच्या योजनांची प्रभावीपणे अंमलबजावणी होण्याकामी गट विकास अधिकारी, आमगाव पंचायत समिती यांना मुख्यालयी निवासस्थान उपलब्ध करुन देणे अत्यंत गरजेचे असल्याने सदर बांधकामाच्या शिफारशीचा ठराव आमगाव पंचायत समितीने दिनांक ५.१२.२००९ रोजी पारित केला आहे. त्याअनुषंगाने कार्यकारी अभियंता, जि.प.,गोंदिया यांनी गट विकास अधिकारी यांच्या निवासस्थानाच्या बांधकामाचे रु.१७.३८लक्ष अंदाजपत्रकीय किंमतीचे सविस्तर अंदाजपत्रक सादर केले आहे. सदरील अंदाजपत्रक सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारीत आहे. या साठी टाईप-IV नमुना नकाशा वापरण्यात आला असून, बांधकामाकरीता एकूण ८५.०९ चौ.मी.क्षेत्रफळ विचारात घेण्यात आले आहे.

अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,गोंदीया यांनी संदर्भीय पत्रान्वये आमगाव पंचायत समितीच्या गट विकास अधिकारी यांच्या निवासस्थानाच्या बांधकामाच्या सादर केलेल्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

-: शासन निर्णय :-

आमगाव (जिल्हा गोंदिया) पंचायत समितीच्या गट विकास अधिकारी निवासस्थानाच्या बांधकामासाठी येणाऱ्या एकूण रुपये-१७,३८,०००/- (रुपये सतरा लक्ष अडतीस हजार फक्त) इतक्या सविस्तर अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठीचा निधी उपलब्धतेनुसार, अर्थसंकल्प वितरण प्रणाली अन्वये (B D S) संगणकाद्वारे वितरीत करण्यांत येईल. हा खर्च "२५१५ इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१)(०५) जिल्हा परिषदांच्या निवासी इमारत बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५१२५६)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर प्रस्तावाची तांत्रिक छाननी मुख्य अभियंता, (प्रमंग्रासयो) यांच्यामार्फत करण्यात आली आहे.

४. या कामी सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येणार नसल्याने, मंजूर प्रमा किंमतीत व मुदतीत बांधकाम पूर्ण करुन घेण्याची संबधित कार्यकारी अभियंता,जि.प.,गोंदिया यांनी दक्षता घ्यावी.

५.	प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

६.	प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्र. २०१००१२७१४५०४६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,
१) विभागीय आयुक्त नागपूर विभाग, नागपूर.
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद गोंदिया
४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद गोंदिया
५) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद गोंदिया
६) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा गोंदिया
७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नागपूर.
८) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा गोंदिया विभाग, गोंदिया
९) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, गोंदिया
१०) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, आमगाव, जिल्हा गोंदिया
११) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३) सार्वजनिक बांधकाम विभाग,इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
१४) का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई